**आणीबाणीच्या कालावधीत बंदिवास सोसाव्या लागलेल्या व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव करणेबाबतची योजना नव्याने सुरु करणे.....**

**मानधनाचे प्रदान करण्याकरिता निधी वितरण करणेबाबत......**

**जिल्हाधिकारी, नागपूर व जिल्हाधिकारी, मुंबई शहर**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१४२३/प्र.क्र.९०/स्वासैक-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ३२.
दिनांक : २७ जून, २०२३.

**संदर्भ**: १) शासन निर्णय क्रमांक निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१, दि. ०३/०७/२०१८
२) शासन निर्णय क्रमांक निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१, दि. ३१/०७/२०२०
३) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-१९१८/प्र.क्र.४०/स्वासैक-१, दि.२८/०७/२०२२
४) शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२/०४/२०२३
५) शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१४२३/प्र.क्र.९०/स्वासैक-१, दि. २७.०४.२०२३
६) शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१४२३/प्र.क्र.९०/स्वासैक-१, दि. ०८.०६.२०२३
७) निवासी उपजिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्र. स्वासेक /कवि-६६/२०२३, दि.२२.०५.२०२३
८) उपजिल्हाधिकारी (सा.प्र.), मुंबई शहर यांचे पत्र क्र. स्वासे /अनुदान मागणी २०२३/६१९, दि.१३.५.२०२३

**प्रस्तावना** :-

"आणीबाणीच्या कालावधीत बंदिवास सोसाव्या लागलेल्या व्यक्तींचा सन्मान / यथोचित गौरव करणेबाबत" ही संदर्भ क्र. २ येथील दिनांक ३१.०७.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये बंद करण्यात आलेली योजना संदर्भ क्र. ३ येथील दिनांक २८.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये पुन्हा नव्याने सुरु करण्यात आली आहे.

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता, मागणी क्रमांक : ए-५, प्रधानलेखाशीर्ष २२३५, सन १९७५ ते १९७७ मधील आणीबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणाऱ्या व्यक्तींना आर्थिक मदत (अनिवार्य), ५० इतर खर्च (२२३५ सी२०५ ) या खाली रु. ५४,२०,४०,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. सदर अर्थसंकल्पीय मंजूर तरतूदीपैकी वित्त विभागाकडून २०% म्हणजेच रु.१०,८४,०८,०००/- इतका निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे (बीम्स) वर प्रत्यक्ष प्राप्त झालेला आहे. त्यापैकी संदर्भ क्र. ५ व ६ येथील शासन निर्णयान्वये (माहे जुन, २०२३ पर्यंत) चा खर्च भागविण्यासाठी जिल्हाधिकारी यांना रु. ९,५५,३०,०००/- एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे.

आणीबाणीच्या कालावधीत बदींवास सोसाव्या लागलेल्या व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव करणे या योजनेअंतर्गत जिल्हाधिकारी, नागपूर व जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी अनुक्रमे संदर्भ क्र.७ व ८ अन्वये निधीची मागणी शासनास केली आहे.

जिल्हाधिकारी, नागपूर व जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी केलेल्या मागणीनुसार, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामधील शिल्लक निधीतून आणीबाणी योजनेतील लाभार्थींचा मानधन विषयीचा खर्च (प्रतीमाह रु. १०,०००/- ५,०००/- २,५००/-) याप्रमाणे अनुज्ञयतेनुसार भागविण्यासाठी मंजूर तरतूदीपैकी जिल्हाधिकारी, नागपूर व जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना आवश्यक इतका निधी त्यांच्या स्वाधीन करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय** :-

प्रस्तावनेत नमूद केलेली बाब विचारात घेऊन, सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता, प्रधानलेखाशीर्ष २२३५, सन १९७५ ते १९७७ मधील आणीबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणाऱ्या व्यक्तींना आर्थिक मदत (अनिवार्य), ५० इतर खर्च (२२३५ सी२०५ ) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या रु.१,२८,७८,०००/- इतक्या निधीपैकी रु.५१,५०,०००/- (अक्षरी एक्कावंन लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, नागपूर यांना मार्च, २०२३ करिता व जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना डिसेंबर, २०२२ ते मार्च, २०२३ करिता आणीबाणी योजनेतील लाभार्थींचा मानधन विषयीचा खर्च भागविण्यासाठी शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र “अ” मध्ये त्यांच्या जिल्हयांच्या नावासमोर दर्शविलेल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे. सर्व पात्र लाभार्थींना मानधन वितरीत करणेबाबतची कार्यवाही करुन त्याबाबतचा अद्ययावत अहवाल शासनास सत्वर सादर करावा.

२. जिल्हाधिकारी, नागपूर व जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना वितरीत करण्यात येणाऱ्या निधीतून खर्च केलेल्या अनुदानाच्या रकमांचा ताळमेळ महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२ नागपूर यांचेकडे विहित कालावधीत करुन खर्चमेळाचा मासिक अहवाल शासनास नियमितपणे सादर करावा.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.ए-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२, सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तिवेतन, (००) (०५) आणिबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणाऱ्या व्यक्तींना आर्थिक मदत (अनिवार्य) ५० इतर खर्च (२२३५ सी २०५) या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. तसेच खर्च झालेल्या रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेळोवेळी सादर करावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०६२८१२०३३९९००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASMITA VIJAY JAWDEKAR

Digitally signed by ASMITA VIJAY JAWDEKAR
DN: CN = ASMITA VIJAY JAWDEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2023.06.28 17:12:07 +05'30'

**( अस्मिता जावडेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर.
७. विभागीय आयुक्त, नागपूर / कोकण विभाग.
८. जिल्हाधिकारी, नागपूर / मुंबई शहर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / मुंबई शहर
१२. सामान्य प्रशासन विभाग, का.२५, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (अर्थसंकल्प १४ / व्यय-४) मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती/स्वासैक-१.

शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१४२३/प्र.क्र.९०/स्वासैक-१, दिनांक : २७ जून, २०२३ सोबतचे

**विवरणपत्र "अ"**

| अक्र. | जिल्हयाचे नाव | लाभार्थी संख्या | लाभार्थ्यांना दरमहा देण्यात येणारे मानधन रु.१०,०००/५,०००/२,५०० प्रमाणे | निधी वितरण रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुंबई शहर | ३९ | १३,९०,०००/- | १३,९०,०००/- |
| २ | नागपूर | ४३२ | ३७,६०,०००/- | ३७,६०,०००/- |
| | **एकुण** | **४७१** | **५१,५०,०००/-** | **५१,५०,०००/-** |

ASMITA VIJAY JAWDEKAR

Digitally signed by ASMITA VIJAY JAWDEKAR
DN: CN = ASMITA VIJAY JAWDEKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2023.06.28 17:12:31 +05'30'

(अस्मिता जावडेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन